**सन २०१८-२०१९ लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि. बार्शी जि.सोलापूर या खाजगी बाजार समितीत कांदा विक्री केलेल्या पात्र लाभार्थ्यांना प्रलंबित कांदा अनुदान वितरीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः- पूरक- २०२२/प्र.क.१७९/२४ स**

मंत्रालय, मुंबई ३२

दिनांक : - २१ मार्च, २०२३

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः- सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स.दिनांक २६ डिसेंबर, २०१८

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः- सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स. दिनांक ३१ जानेवारी, २०१९ व दिनांक १५ फेब्रुवारी, २०१६,

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः- सपस २०१८/प्र.क्र.३६७/२४ रा. दिनांक १६ फेब्रुवारी २०१९

४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः- सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स. दिनांक ८ मार्च, २०१९

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः- पूरक २०१९/प्र.क्र.२९/१७ स. दिनांक १० जुलै, २०१९

६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः-पूरक-२०१९/प्र.क्र.७१ /२४ स. दिनांक ७ ऑगस्ट, २०१९

७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः- सपस २०१९/प्र.क्र.१२६/२४ स. दिनांक १९ ऑगस्ट, २०१९

८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांकः- पूरक-२०१९/प्र.क्र.१०८/१७ स. दिनांक ०४ जानेवारी, २०२०

९) शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग
क्रमांकः- सपस २०२०/प्र.क.७१ /२४ स, दिनांक १६ जून, २०२०

१०) शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग
क्रमांकः- सपस २०१८/प्र.क.३६७ /२४ स, दिनांक १७ ऑक्टोबर,२०२२

११) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र
क्रमांक :- पणन- १३ / कां. अ. २०१८-१९/पु. मा. / सोलापूर / २०१९, दिनांक १३ डिसेंबर, २०१९

**<u>प्रस्तावना:-</u>**

शासन निर्णय, दिनांक २६ डिसेंबर, २०१८ अन्वये सुरुवातीस राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्या व प्रसन्न कृषी मार्केट, पाडळीआळे या खाजगी बाजार समितीमध्ये १ नोव्हेंबर, २०१८ ते १५ डिसेंबर २०१८ या कालावधीत कांदा विक्री केलेल्या पात्र शेतकऱ्यांना रुपये २०० प्रति क्विंटल व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी या प्रमाणात अनुदान मंजूर करण्यात आले आहे. या योजनेंतर्गत कांदा अनुदानाचा कालावधी वेळोवेळी वाढविण्यात आला असून सुधारित अंतिम कालावधी दिनांक १ नोव्हेंबर, २०१८ ते २८ फेब्रुवारी, २०१९ असा निश्चित करण्यात आला आहे.

कांदा अनुदान योजनेसाठी उपलब्ध करुन दिलेला निधी पुढीलप्रमाणे आहे:-

**(रुपये कोटीत)**

| शासन निर्णय, दिनांक | | उपलब्ध निधी | जिल्हा | लाभार्थी |
|---|---|---|---|---|
| १६/२/२०१९ | आकस्मिकता निधी | रुपये ११४.८००० | १७ जिल्हे | १,६०,६९८ |
| ७/८/२०१९ | पूरक मागणी | रुपये ३८७.३०३१ | १९ जिल्हे | ३,९३,३१७ |
| २४/१/२०२० | पूरक मागणी | रुपये २.३०२९ | २ जिल्हे | २,५३२ |
| १६/६/२०२० | आयसीआयसीआय बँकेकडे जमा झालेल्या व्याजामधून | रुपये ०.२७२३ | ४ जिल्हे | १७६ |
| १/११/२०२२ | पूरक मागणी | रुपये २.६४६० | १ जिल्हे | ११७२ |
| **एकूण** | | **रुपये ५०७.३२४३** | | **५,५७,८९५** |

पणन संचालनालयाकडून लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि. बार्शी जि.सोलापूर या खाजगी बाजार समितीत कांदा विक्री केलेल्या पात्र **८०७४** शेतकऱ्यांच्या अनुदानासाठी रुपये **७,४७,०२,८२४/-** इतका निधी उपलब्ध करुन देण्यासाठी मागणी करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने सन २०१८-१९ या वर्षातील लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि. बार्शी जि.सोलापूर या खाजगी बाजार समितीचे प्रलंबित कांदा अनुदान उपलब्ध करुन वितरित करण्यासाठी **रुपये ७,४७,००,०००** इतक्या रकमेची पुरवणी मागणी डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर केलेला निधी **रुपये ७,४७,००,०००** संचालनालयाकडून लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि. बार्शी जि.सोलापूर या खाजगी बाजार समितीत कांदा विक्री केलेल्या पात्र लाभार्थ्यांना वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक २०/१२/२०१८ च्या बैठकीत राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्या व प्रसन्न कृषी मार्केट, पाडळीआळे या खाजगी बाजार समितीमध्ये १ नोव्हेंबर,

२०१८ ते १५ डिसेंबर २०१८ या कालावधीत कांदा विक्री केलेल्या पात्र शेतकऱ्यांना रुपये २०० प्रति क्विंटल व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी या प्रमाणात अनुदान मंजूर करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्याच प्रमाणे सन २०१८-२०१९ या वर्षात दिनांक १ नोव्हेंबर, २०१८ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ या कालावधीसाठी निश्चित केलेल्या कांदा अनुदान योजनेत लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि.बार्शी जि.सोलापूर या खाजगी बाजार समितीचा समावेश करण्यास कार्योत्तर शासन निर्णय, दिनांक १७/१०/२०२२ अन्वये मंजूरी देण्यात आली आहे. यास्तव लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि. बार्शी जि.सोलापूर या खाजगी बाजार समितीत कांदा विक्री केलेल्या पात्र **८०७४** शेतकऱ्यांच्या अनुदानासाठी रुपये **७,४७,००,०००/-** (अक्षरी रुपये सात कोटी, सत्तेचाळीस लाख फक्त) वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि. बार्शी जि.सोलापूरसाठी कांदा अनुदान वितरित करण्याचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | बाजार समितीचे नांव | लाभार्थी संख्या | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|
| १ | लक्ष्मी सोपान ॲग्रीकल्चर प्रोड्यूस मार्केटिंग कंपनी लि. बार्शी जि.सोलापूर | ८०७४ | रुपये ७,४७,००,००० |
| **एकूण** | | **८०७४** | **रुपये ७,४७,००,०००** |

३. सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात या योजनेंतर्गत होणारे खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखालील उपलब्ध तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावेत:-

**मागणी क्रमांक व्ही-२**

२४२५ सहकार

१०७ सहकारी पत संस्थांना सहाय्य

(०१) सहकारी पत संस्थांना सहाय्य

(०१)(०८) कांदा उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य दत्तमत (अनिवार्य)

(२४२५ १४२१)

**३३ अर्थसहाय्य**

४. सदर अनुदान पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आयसीआयसीआय बँकेमार्फत अदा करण्यात यावे.

५. या योजनेंतर्गत उपलब्ध तरतूदीचे आहरण करुन ती संबंधित बाजार समितीला वितरीत करण्याच्या प्रयोजनार्थ लेखाधिकारी, पणन संचालनालय, पुणे यांना आहरण व

संवितरण अधिकारी व पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर अनुदान वितरित केल्याचा अहवाल पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी १ महिन्यात शासनास सादर करावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व अनौपचारिक संदर्भ क्रमांक- १०८/ २०२३/व्यय-२, दिनांक १३/३/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३२११४५९४९६५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2023.03.21 15:05:44 +05'30'

**( डॉ. सुग्रिव सं. धपाटे )**
**सह सचिव (पणन), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

I. मा. मुख्यमंत्री तथा मा. मंत्री (पणन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
II. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
III. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
IV. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
V. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
VI. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई
VII. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
VIII. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
IX. विभागीय उपनिबंधक, सहकारी संस्था, पुणे
X. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सोलापूर
XI. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) , मुंबई/नागपूर,
XII. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
XIII. लेखा कोषागार अधिकारी, पुणे.
XIV. अवर सचिव (१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
XV. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.